यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ आणि यशस्वी इन्स्टिटयूट ऑफ टेक्नॉलॉजी, पुणे, यांच्या संयुक्त विद्यमानाने चालविण्यात येणा-या 'शिका व कमवा' या योजनेसाठी शासनाचे सहाय्य उपलब्ध करुन देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
शासन निर्णय क्र.टिईडी २०१०/(१४४/१०)/तांशि ५,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २६ जुलै,२०१०.

**प्रस्तावना :**

यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ आणि यशस्वी इन्स्टिटयूट ऑफ टेक्नॉलॉजी, पुणे, यांच्यामध्ये दि.२४ मे,२०१० रोजी एक सामंजस्य करार करण्यात आला आहे. उक्त सामंजस्य करारातील तरतूदीनुसार राज्यामध्ये यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठामार्फत चालविण्यात येणाऱ्या पदविका स्तरावरील विविध अभ्यासक्रम, यशस्वी इन्स्टिटयूट ऑफ टेक्नॉलॉजी, पुणे, यांच्या संयुक्त विद्यमाने 'शिका व कमवा' या उपक्रमांतर्गत राबविण्यात येणार आहे.

१.२ १०व्या पंचवार्षिक योजनेंतर्गत रोजंदारीचा एकूण आढावा घेऊन कुशल आणि प्रशिक्षित कामगारांना प्रशिक्षण देण्याचे धोरण अवलंबिले आहे. त्यानुसार ५० कोटी कुशल व तंत्र शिक्षण आधारीत प्रशिक्षण देऊन मनुष्यबळ उत्पन्न करावयाचे आहे. 'स्किल डेव्हलपमेंट इनिशिएटीव्ह' या योजनेंतर्गत तंत्र शिक्षण संचालनालयाचा मोठया प्रमाणात वाटा असून, त्यानुसार यापूर्वीच औद्योगिक क्षेत्रामध्ये काम करीत असलेल्या विद्यार्थ्यांना किंवा औद्योगिक क्षेत्रामध्ये सामावून घेणाऱ्या प्रशिक्षणार्थ्यांना स्किल डेव्हलपमेंट आणि स्कील अपग्रेडेशन' या कार्यक्रमात सहभाग करुन घेणे क्रमप्राप्त ठरणार आहे. त्याकरीता पब्लीक सेक्टर व प्रायव्हेट सेक्टर यांनी आपापसात भागीदारी तत्त्वावर काम करणे आवश्यक आहे. ही बाब विचारात घेऊन यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ आणि यशस्वी इन्स्टिटयूट ऑफ टेक्नॉलॉजी, पुणे, यांच्या संयुक्त विद्यमाने 'शिका व कमवा' ही योजना अंमलात आली आहे, या माध्यमातून पदविका स्तरावरील अभ्यासक्रम राज्यभरात गरीब विद्यार्थ्यांना शिकत असताना on the job प्रशिक्षण देऊन त्यांना उद्योगधंद्यामध्ये सामावून घेण्यात येणार आहे. या कालावधीत त्यांना विद्यावेतन देखील देण्यात येणार आहे. त्यामुळे गरीब विद्यार्थ्यांना मोफत तंत्र शिक्षण तसेच विद्यावेतन हे दोन्ही फायदे प्राप्त होणार आहेत. या उपक्रमांतर्गत येणारा संपूर्ण खर्च उपभोक्ता म्हणून उद्योजकांकडून सोसण्यात येणार आहे. त्यामुळे प्रत्यक्षात शासनावर कोणत्याही प्रकारचा आर्थिक भार पडणार नाही.

१.३ वरील पार्श्वभूमीवर यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ आणि यशस्वी इन्स्टिटयूट ऑफ टेक्नॉलॉजी, पुणे, यांच्या संयुक्त विद्यमाने चालविण्यात येणाऱ्या 'शिका वा कमवा' या योजनेला शासनाचे सहकार्य देण्याबाबतचा प्रस्ताव विचाराधिन होता. उक्त प्रस्तावाचा सर्वांगीण विचार करुन शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय**

२. यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ आणि यशस्वी इन्स्टिटयूट ऑफ टेक्नॉलॉजी, पुणे, यांच्या संयुक्त विद्यमाने चालविण्यात येणाऱ्या 'शिका व कमवा' या उपक्रमांतर्गत सहभागी झालेल्या विद्यार्थ्यांना, पदविका स्तरावरील प्रशिक्षणाकरीता, शासनाचे सहकार्य म्हणून उपलब्धतेनुसार राज्यातील सर्व

शासकीय तंत्र निकेतने, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये, यांमधील प्रयोगशाळा, कार्यशाळा, वर्ग खोल्या, संचालक, तंत्र शिक्षण, म. रा., मुंबई, यांनी संचालनालय स्तरावर अवलंबविण्यात आलेल्या कार्यपध्दतीनुसार विद्यापिठाने ठरविलेल्या शिक्षण शुल्काच्या २५% इतकी रक्कम संबंधित शासकीय संस्थाना भाड्यापोटी अदा करण्याच्या अटीच्या अधिन राहून उपलब्ध करुन देण्यात यावे.

३. 'शिका व कमवा' या उपक्रमांतर्गत सहभाग असलेल्या सर्व विद्यार्थ्यांना on the job प्रशिक्षण उद्योग व्यवसायामध्ये देण्यात येते. सदर शिक्षण पूर्ण झाल्यानंतर त्यांना अभियांत्रिकी पदविका प्रमाणपत्र, यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठामार्फत देण्यात येणार आहे, ही बाब विचारात घेऊन, प्रशिक्षणार्थींना 'ॲप्रेंटिसशिप कायदा १९६१' मधील तरतुदीचे तंतोतंत पालन करण्याच्या अटीच्या अधिन राहून त्यांना सहा महिने ते चार वर्ष कालावधीपर्यंत 'ॲप्रेंटिस' म्हणून संबोधण्यात यावे.

४. उक्त प्रशिक्षणार्थींचा प्रशिक्षणाचा कालावधी चार वर्षापलिकडे जाणार नाही याची काळजी विद्यापिठाने घ्यावी. तसेच विद्यार्थ्यांना ॲप्रेंटिसशिप कायदा १९६१ मधील तरतुदींनुसार अनुज्ञेय ठरविलेल्या किमान विद्यावेतन किंवा उद्योजकांनी देऊ केलेले रुपये ५०००/- ते रु. ६५००/- विद्यावेतन यापैकी जे अधिक असेल ते विद्यावेतन संबंधित उद्योजक यांजकडून देण्यात यावे..

५. विद्यार्थ्यांसाठी साधनसामुग्री, पाठयपुस्तके व साहित्य, इत्यादी आणि प्रशिक्षणावरील इतर सर्व खर्चाचा भार ज्या कारखान्यामध्ये विद्यार्थी प्रशिक्षण घेत असतील त्या उद्योजक आस्थापना सोसतील.

६. सर्व सहभागी शिकाऊ विद्यार्थ्यांचा विमा उतरविण्यात यावा व वैद्यकीय देखभाली संदर्भात आवश्यक त्या उपाय योजना कराव्यात.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(व्य. ह. कुलकर्णी)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक.
३) यशस्वी इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, पुणे.
४) संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, वांद्रा (पूर्व), मुंबई ५१.
५) अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, पश्चिम विभागीय कार्यालय, मुंबई.
६) सर्व प्राचार्य, शासकीय तंत्र निकेतने,
७) सर्व प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये,
८) प्राचार्य, शासकीय दूरशिक्षण तंत्र निकेतन, पुणे.
९) मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
१०) मा.सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव.
११) निवड नस्ती, तांशि-५.